# अल्बट्रॉसचं पिल्लू

लेखक: मायकेल मॉरपुर्गो
चित्रे: मायकेल फोरमन

हिवाळ्याच्या शेवटी बर्फ वितळू लागले. माता अल्बट्रॉस, अगदी स्तब्ध बसली होती, निळ्या-हिरव्या सागरावर नजर लावून!

तिच्या पायाशी, तिच्या मुलायम उबदार पंखांच्या कुशीत, तिचं छोटंसं पिल्लू सुखात झोपलं होतं. हा छोटासा सुदृढ जीव काही तासांपूर्वीच जन्माला आला होता.



सागरात दूरवर लाटांच्या वर पिता अल्बट्रॉस उडत होते. आपले विशाल पंख फडफडवत ते घरी परतत होते. त्यांनी बऱ्याच माशांची शिकार करून आणि गिळून त्यांना साठवले होते.

“स्वागत आहे घरी!” माता अल्बट्रॉस म्हणाली. एखाद्या आईला वाटेल असाच अभिमान तिला वाटत होता.

झोपेत स्वप्न बघतानाही छोट्या अल्बट्रॉस पिल्लाला माशाचा वास आला.

“बाबा, मला मासा पाहिजे खायला,” तो हट्ट करत म्हणाला. “मला मासा द्या.”

“तुला खाऊ घालायलाच तर आहोत आम्ही,” पिता अल्बट्रॉस म्हणाले.

छोट्याशा अल्बट्रॉसने शक्य होईल तितके मासे खाऊन घेतले आणि तो पुन्हा झोपी गेला.



त्यानंतर, माता-पिता आळीपाळीने घरट्यात राहू लागले आणि माशांची शिकार करायला जाऊ लागले. घरट्यांत ते आपल्या पिल्लाला ऊबदार पंखांखाली घेऊन सुरक्षित ठेवू लागले.

दिवसेंदिवस, खाऊन-पिऊन, सुरक्षित आणि ऊबदार वातावरणात, छोटा अल्बट्रॉस अंगापिंडाने छान वाढू लागला. त्याची हालचाल आणि दंगाही वाढला. त्यासोबतच त्याची भूकसुद्धा वाढली. त्याच्या अंगावर पांढरीशुभ्र मुलायम पिसे उगवली. त्याचे पंख लांब, रूंद आणि सुंदर दिसू लागले.

पण तिथून जवळच एक शिकारी पक्षी टपून बसला होता. अतिशय सावधचित्ताने आणि शांत राहून तो संधी शोधत होता. अल्बट्रॉस मात्या-पित्यांना त्याच्या उपस्थितीची चाहूल अजिबात लागली नव्हती.

मग एके दिवशी माता आणि पिता अल्बट्रॉस यांनी पाहिले की आपलं लहानगं पिल्लू आता अंगापिंडाने चांगलंच वाढलंय आणि बळकट झालंय. आता त्याला थोडा वेळ एकटं सोडून आपण एकत्र माशांची शिकार करायला जाण्यात भय नाही, असे त्यांना वाटू लागले. ते एकत्र पर्वताच्या शिखरावरून भटक्या अल्बट्रॉसचे सुंदर गीत गात उडू लागले. त्यांनी खाली बसलेल्या शिकारी पक्ष्याला पाहिले नाही. परंतु शिकारी पक्ष्याने त्यांना जाताना पाहिले होते. तो याच संधीची वाट पाहात होता.



“बाबा! आई!” छोटा अल्बट्रॉस ओरडू लागला. त्याचे आईबाबा यापूर्वी त्याला एकटे सोडून कधीच गेले नव्हते.
“परत या! परत या!”

पण वारा घोंघावू लागला, लाटा गर्जना करू लागल्या आणि त्यांच्या आवाजात आईबाबा पिल्लाची हाक ऐकू शकले नाहीत. सागराच्या उसळत्या लाटांच्यावर ते उडू लागले आणि खाली पाण्यात पोहोणाऱ्या माशांचा लक्षपूर्वक शोध घेऊ लागले. शिकार करण्यासाठी माशांची एक ओझरती झलकही त्यांना पुरेशी होती.

खाली येऊन त्यांनी निळ्या-हिरव्या सागरात खोलवर सूर मारला. पुन्हा वर येऊन ते लाटांवर स्वार झाले आणि चोचीत पकडलेले मासे गिळू लागले.

त्या रात्री छोटा अल्बट्रॉस त्यांच्या घरट्यात एकटाच झोपला. दबकत दबकत जवळ येणाऱ्या शिकारी पक्ष्याला त्याने पाहिलेच नाही.



सकाळ झाली तेव्हाही माता-पिता अल्बट्रॉस एकत्र निळ्या-हिरव्या सागरावरच भटकत होते, पाण्यावर उडत होते. त्यांना खाली पाण्यात एक मासेमारीचे जहाज दिसले. पाहा! त्या जहाजामागोमाग हजारो चमकते मासे पोहत येत होते. मोठी मेजवानीच होती!

काही विचार न करता दोघांनी उसळत्या सागरात सूर मारला आणि ते एकामागोमाग एक मासे पकडू लागले. मग ते पुन्हा वर येऊ लागले, स्वच्छ सूर्यप्रकाशात, मोकळ्या हवेत.



पण आपल्या भोवती मासेमाऱ्यांचे जाळे आवळत चालले आहे, हे त्यांच्या गावीही नव्हते. शेवटी तेसुद्धा माशांसोबतच त्या जाळ्यात अडकले. स्वत:ची सुटका करून घेण्याचा त्यांनी बराच प्रयत्न केला, आटापिटा केला.
पण त्यामुळे ते अधिकाधिक जाळ्यात अडकत गेले.
शेवटी ते हतबल झाले.
त्यांच्याभोवती केवळ हजारो चमकते मासेच नव्हते तर डॉल्फिन आणि कासवसुद्धा होते.

दरम्यान....
डोंगराच्या कड्यावर.
शिकारी पक्षी छोट्या अल्बट्रॉसच्या आणखी जवळ गेला. खूपच जवळ!



छोट्या अल्बट्रॉसने त्याला अजून पाहिले नव्हते.

माता आणि पिता अल्बट्रॉस जाळ्यात अडकले होते. ते जिवंत होते, पण पुढे काय? मग खोल सागरातून त्यांना शार्कची सावली वर येताना दिसली. त्यांनी स्वतःची सुटका करून घेण्याचा एक शेवटचा प्रयत्न केला. जाळ्यातील खाद्याच्या लोभाने चवताळून शार्कने जाळ्यावर हल्ला चढवला. आपल्या भयंकर ताकदीच्या जोरावर त्याने जाळे फाडून टाकण्याचा प्रयत्न केला.





पण शार्कला खूप उशीर झाला होता. मासेमाऱ्यांनी जाळे आधीच वर खेचायला सुरूवात केली होती.

जाळे पाण्याच्या वर आले तेव्हा त्यात हजारो मासे होते.

शिवाय त्यात कासव, डॉल्फिन आणि माता-पिता अल्बट्रॉसही होते.

मासेमाऱ्यांनी अल्बट्रॉसची जोडी पाहाताच त्यांना जाळ्यातून मुक्त केले. पण त्यांच्यात उडून जाण्याचे त्राण शिल्लक राहिले नव्हते. त्यामुळे मासेमाऱ्यांनी त्यांना जहाजावर थोडी विश्रांती घेऊ दिली.



खलाशांनी त्यांची काळजी घेतली आणि त्यांना ताकद मिळावी म्हणून खाऊही घातले. संध्याकाळी अल्बट्रॉसची जोडी जहाज सोडून उडून जाऊ लागली तेव्हा साऱ्या खलाशांनी हात हलवत त्यांना निरोप दिला.



एव्हाना, शिकारी पक्षी छोट्या अल्बट्रॉसच्या भोवती घिरट्या घालू लागला. तो पिल्लाची शिकार करायला पुढे पाऊल टाकू लागला. दिर्घ काळ या संधीची वाट त्याने पाहिली होती.

छोट्या अल्बट्रॉसने त्याला येताना पाहिले, त्याच्या डोळ्यातली खुनशी चमक पाहिली.

“आई! बाबा!”
तो मोठ्याने ओरडला.
“वाचवा मला!
मला वाचवा!”

अचानक वरून एक मर्मभेदक किंचाळी ऐकू आली. माता आणि पिता अल्बट्रॉस बाणासारखा सूर मारत खाली आले आणि शिकारी पक्ष्यावर तुटून पडले.

शिकारी पक्षी समजून चुकला की तिथे जास्त वेळ राहिले तर हे आपल्याला मारून टाकतील. माता-पिता अल्बट्रॉसनी त्याला त्रस्त करून सोडले आणि तो आता परत येणार नाही, ही खात्री पटेपर्यंत त्याचा पाठलाग करून त्याला दूर पिटाळून लावले.





ते आपल्या पिल्लाजवळ परतले तेव्हा तो उड्या मारत होता. आपल्या आईबाबांना पाहायला आणि त्यांनी आणलेले मासे खायला तो उतावीळ झाला होता. पण तो त्यांच्यावर नाराजही झाला होता.

“बाबा! आई!” तो ओरडला. “मी कितीवेळ तुमची वाट पाहिली! मी खूप घाबरलो होतो. मला खूप भूक लागली होती. तुम्ही कुठे होता? काय करत होता?”

“ती मोठी कहाणी आहे, पिल्ला,” पिता अल्बट्रॉस म्हणाले.

“आम्ही तुला परत कधीच एकटं सोडणार नाही,” माता अल्बट्रॉस म्हणाली. “वचन देते.”

“मला खायला द्या, बाबा! मला खायला दे, आई,” छोटा अल्बट्रॉस ओरडू लागला.

“त्याच्यासाठीच तर आहोत आम्ही!” माता अल्बट्रॉस म्हणाली. मग त्यांनी छोट्या अल्बट्रॉसला खाऊ घातले, त्याचं समाधान होईपर्यंत.



मग तो झोपी गेला. तो झोपेत असताना हिवाळ्यातील पहिलावहिला बर्फवर्षाव सुरू झाला. भटक्या अल्बट्रॉसचे गीत, निळ्या-हिरव्या समुद्राच्या लाटांवर तरंगू लागले.



समाप्त

